**कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत 'अन्नधान्य पिकांकरीता' अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता सन २०१६-१७ करीता ₹ ११७६.९८ लाख निधी वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राकृवि ०६१६/प्र.क्र.७२/राकृवियो कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३० मार्च, २०१७

**वाचा:-**

१. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र - No. CPS १-१/२०१५-NFSM, दि. ०९/०७/२०१५
२. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र - No. २०-१/२०१२-NFSM (CA-V) दि. १२/११/२०१५
३. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि. २० /०४/२०१६
४. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. वानियो २०१५/प्र.क्र. ५५/भाग-१/१५/२अे, दि.१८/०५/२०१६
५. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र No. F.No.2-17/2016 - NFSM दि. २३/०५/२०१६
६. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. असूअ ०४१६/प्र.क्र. ४३/राकृवियो कक्ष, दि.२७/०५/२०१६
७. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र No. F.No.20-27/2012 - NFSM (CA-V) दि. ०९/०६/२०१६
८. शासन निर्णय क्र. राकृवि ०६१६/प्र.क्र. ७२/राकृवियो कक्ष, दि.१७/०१/२०१७
९. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र No. F.No.20-27/2012 - NFSM (CA-V) दि. १५/०३/२०१७
१०. आदिवासी विकास विभाग, शासन ज्ञापन क्र.पुरक-२०१७/प्र.क्र.१२७/कार्यासन-०६,दि.२७.०३.२०१७
११.आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१६/प्र.क्र.१३/कार्यासन.६, दि.२९/३/२०१७

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान १०० % केंद्र पुरस्कृत अभियान म्हणून सन २००७-०८ पासून सन २०१४-१५ पर्यंत राबविण्यात येत होते तसेच, सन २०१३-१४ पर्यंत भात, गहु व कडधान्य पिकांकरीता केंद्र शासन अर्थसंकल्प बाहय तरतुदीतून सदर अभियानाकरीता राज्य शासनांना निधी उपलब्ध करुन देत असे. केंद्र शासनाने सन २०१४-१५ पासून अभियानांतर्गत भरडधान्य पिकांचा तसेच ऊस व कापूस या वाणिज्यीक पिकांवर आधारीत पिक पध्दतींचा समावेश केला तसेच, सदर अभियानाकरीता केंद्र शासन राज्य शासनांना अर्थसंकल्पीय तरतूदीद्वारे १००% निधी उपलब्ध करुन देत होते. त्यानुषंगाने सदर अभियानाच्या अंमलबजावणीस संदर्भांकित शासन निर्णय दि.१९/०५/२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर अभियांतर्गत समाविष्ट पिकांच्या उत्पादन व उत्पादकतेत वाढ करणे, शेत जमिनीची सुपीकता व उत्पादकता वाढविणे, रोजगारांची संधी निर्माण करणे व शेतक-यांच्या उत्पादनात वाढ करणे ही प्रमुख्य उद्दीष्ट आहेत.

त्यानुषंगाने राज्य शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांसाठी (भात, गहू, कडधान्य व भरडधान्य) **₹** ३२३९४.०० लाख रकमेचा कृती आराखडा केंद्र शासनाच्या मंजूरीस्तव सादर केला होता सदर कृती आरखडयास केंद्र शासनाने संदर्भांकित दि.२३/०५/२०१६ रोजीच्या पत्रान्वये मंजूरी दिली होती. सन २०१६-१७ पासून केंद्र शासनाने कृषी उन्नती योजनेच्या अंतर्गत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान समाविष्ट केले असून सदर अभियान केंद्र व राज्याच्या ६०:४० अर्थसहाय्याने राबविण्याबाबत तसेच, चालू वर्षी अभियानांतर्गत **₹** ३२३९४.०० लाख रकमेच्या कृती आरखडयास संदर्भांकित दि.२७.०५.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे, त्यानुसार अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांसाठी केंद्र शासनाचा **₹** १९४३६.४० लाख व राज्य शासनाचा **₹** १२९५७.६० लाख आर्थिक सहभाग अपेक्षित आहे.

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांसाठी अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता संदर्भाधिन दि.१७ जानेवारी, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र शासनाकडून पहिल्या हप्त्यामध्ये प्राप्त झालेला केवळ केंद्र हिस्याचा **₹** ८६४.९३ लाख निधी वितरीत करण्यात आला होता तथापि, राज्य हिस्यासाठी निधीची तरतुद उपलब्ध नसल्यामुळे समरुप राज्य हिस्याचा **₹** ५७६.६३ लाख निधी वितरीत करणे अद्याप शिल्लक आहे.

संदर्भांकित दि. १५ मार्च, २०१७ रोजीच्या पत्रान्व्ये केंद्र शासनाने या अभियानांतर्गत कडधान्य पिकांकरीता दुसऱ्या हफ्त्यात केंद्र हिस्याचा एकूण ₹ ४०४७.३२ लाख निधी वितरीत केला आहे. सदर निधीपैकी अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता ₹ ३६०.२१ लाख निधी प्राप्त झाला असून समरुप राज्य हिस्याचा ₹ २४०.१४ लाख निधी असा एकूण ₹ ६००.३५ लाख निधी दुसऱ्या हफ्त्यात वितरीत करणे त्याचप्रमाणे, पहिल्या हप्त्यात वितरीत केलेल्या केंद्र हिस्स्याच्या निधीस समरुप राज्य हिस्याचा **₹** ५७६.६३ लाख निधी वितरीत करणे शासनाच्या विचाराधीन होते, आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधिन दि.२७.०३.२०१७ रोजीच्या ज्ञापनान्व्ये व दि.२९.०३.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांसाठी अनुक्रमे राज्य व केंद्र हिस्याची रक्कम वितरीत करण्यात आलेली आहे. अशाप्रकारे अभियानांतर्गत केंद्र व राज्य हिस्स्याचा (पहिल्या व दुसऱ्या हफ्त्याचा) मिळून एकूण **₹** ११७६.९८ लाख निधी वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. सन २०१६-१७ करीता कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत अन्नधान्य पिकांकरीता अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण **₹** ११७६.९८ लाख (रुपये अकरा शहात्तर लाख अठ्ठयाण्णव हजार फक्त) निधी या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषी), पुणे, यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे पिक निहाय उपलब्ध करुन देण्यात येत आहे, सदर निधीपैकी केंद्र हिस्सा ₹ ३६०.२१ लाख व राज्य हिस्सा ₹ ८१६.७५ लाख निधीचे विवरण पुढीलप्रमाणे -

**(₹ लाख)**

| अ.क्र. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत पिके | अनुसूचित जमाती प्रवर्ग | | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| | | पहिला हप्ता | | दुसरा हप्ता | | |
| | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | |
| १. | भात | -- | ३४.३२ | -- | -- | ३४.३२ |
| २ | गहु | -- | ११.७७ | -- | -- | ११.७६ |
| ३ | भरडधान्य | -- | ८७.१९ | -- | -- | ८७.१९ |
| ४ | कडधान्य | -- | ४४३.३५ | ३६०.२१ | २४०.१४ | १०४३.७० |
| **एकूण** | | **--** | **५७६.६३** | **३६०.२१** | **२४०.१४** | **११७६.९८** |

२. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला केंद्र हिस्याचा **₹**३६०.२१ लाख (रुपये तीन कोटी साठ लाख एकवीस हजार फक्त) निधी खालील लेखाशिर्षातर्गत सन २०१६-१७ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

**मागणी क्रमांक टी-५**
**२४०१- पीक संवर्धन,**
**७९६-जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना),**
**(०१) जनजाती क्षेत्राअंतर्गत उपयोजना,**
**(०१) (२१) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके**
**(केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ A५५७) ३३, अर्थसहाय्य**

तसेच राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेला राज्य हिस्याचा **₹८१६.७५ लाख** (रुपये आठ कोटी सोळा लाख पंचाहत्तर हजार फक्त) निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१६-१७ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

**मागणी क्रमांक टी-५**
**२४०१- पीक संवर्धन,**
**७९६-जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना),**
**(०१) जनजाती क्षेत्राअंतर्गत उपयोजना,**
**(०१) (२०) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके**
**(राज्य हिस्सा ४०%) (२४०१ A५६६) ३३, अर्थसहाय्य**

३. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य हिस्याचे **₹ ११७६.९८ लाख** रक्कमेचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरीता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हा निहाय वाटप करावयाचा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे विभागीय कृषी सह संचालकांमार्फत वितरीत करावा.

या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या **₹ ११७६.९८ लाख** निधीचे विविध कार्यालयांच्या स्तरावर कोषागारातून आहरण व वितरणाकरिता खालील अधिका-यांना त्या-त्या स्तरावर नियंत्रण अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे -

| अ. क्र. | कार्यालय | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | कृषी आयुक्तालय | संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे |
| २. | विभागीय सह संचालक (कृषी) | विभागीय सह संचालक (कृषी) | संबंधित विभागीय सह संचालक (कृषी) यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी |
| ३. | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी |
| ४. | तालुका कृषी अधिकारी | तालुका कृषी अधिकारी | तालुका कृषी अधिकारी |

४. दि. १९/०५/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत राज्य स्तरावर, कृषी आयुक्तालय स्तरावर, विभागीय स्तरावर व जिल्हास्तरावर गठीत करण्यात आलेल्या समित्यांनी चालू वर्षी देखिल त्यांना विहीत केलेल्या जबाबदा-यांचे निर्वहन करावयाचे आहे तसेच, अभियान संचालक म्हणून संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांची नियुक्ती केलेली आहे.

५. केंद्रिय कृषी मंत्रालयाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत राज्य शासनास सन २०१६-१७ करीता संदर्भांकित दि. २३ मे, २०१६ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त मान्यतेनुसार तसेच, संदर्भांकित दि. २७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार, तसेच चालू वर्षी अभियानाकरीता मंजूर केलेल्या कृति आराखडयानुसार आणि वेळोवेळी केंद्रीय कृषी मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील, याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरुन अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

६. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत विविध घटकांतर्गत लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांना वा सदर शेतक-यांच्या गटांना प्राधान्य देण्यात यावे, त्याचप्रमाणे केंद्र शासनाने अभियानांतर्गत ज्या घटकांखाली थेट लाभार्थ्यांच्या खाती अनुदान जमा करण्याचे (Direct Benefit Transfer) निदेशीत केले आहे त्या घटकांची चालू वर्षी केंद्र शासनाच्या निदेशानुसार अंमलबजावणी करण्यात यावी.

७. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकाऱ्यांनी/तालुका कृषी अधिकाऱ्यांनी अभियानाकरीता लाभार्थ्यांची निवड करुन अभियानांतर्गत समाविष्ट कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका स्तरावर

संकलित करावी. सदर यादीमध्ये शेतकऱ्याचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक या बाबींसह, मोबाईल/दुरध्वनी क्रमांक, बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. पैकी किमान एका बाबीची माहिती संकलित करण्यात यावी. त्याचप्रमाणे अभियानांतर्गत निवडण्यात आलेल्या लाभार्थ्यांची यादी निधी प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांमध्ये कृषी विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकाऱ्यांची राहील.

८. सदर लाभार्थ्यांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतकऱ्यांच्या शेतावर हाती घेण्यात आलेल्या कार्यक्रामाची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषी सहायकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषी अधिकाऱ्यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषी अधिकाऱ्यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषी सहायकांचे अहवाल प्राप्त होताच सदर कार्यक्रमांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

९. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे प्रधान सचिव (कृषी) यांच्या स्वाक्षरीने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास निर्गमित करण्यात येईल.

१०. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१५४६३४९६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2017.03.30 15:48:35 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. प्रधान सचिव (आदिवासी विकास), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.

८. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.

९. सर्व विभागीय कृषी सहसंचालक

१०.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी

११.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.

१२.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर

१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर

१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य

१५.सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे

१६.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई

१७.मा. मंत्री (कृषी) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१८. मा. राज्य मंत्री (कृषी) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१९.निवड नस्ती.